**स्वयंसेवी संस्थेमार्फत चालविल्या जाणाऱ्या बंद पडलेल्या / मान्यता रद्द केलेल्या /स्वेच्छेने बंद केलेल्या तसेच सध्या कार्यरत असलेल्या विजाभज / अनुसूचित जाती प्रवर्गाच्या आश्रमशाळा, या अन्य स्वयंसेवी संस्थेस हस्तांतरण / स्थलांतरण करण्याबाबतची कार्यपद्धती.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विभशा २०१२/प्र.क्र.२२१/विजाभज-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२.
दिनांक : १९ डिसेंबर, २०१६

**वाचा:-**

१. समाज कल्याण,सांस्कृतीक कार्य व क्रिडा व पर्यटन विभाग, शासन निर्णय क्रमांकः क्र. बीसीएच-१०९७ /प्र.क्र. १०७/मावक-४, दि. १६ मार्च, १९९८
२. समाज कल्याण,सांस्कृतीक कार्य व क्रिडा व पर्यटन विभाग, शासन निर्णय क्रमांकः अजाअ-१०९९/प्र.क्र.३८९/मावक-२, दि. २९ मे, १९९९
३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन निर्णय क्रमांकः क्र. विभशा-२००७/प्र.क्र.९२/ मावक-६, दि. १.८.२००७
४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन निर्णय क्रमांकः क्र. विभशा-२०१२/१४९७/प्र.क्र.२२१/विजाभज-२, दि. १६.१०.२०१२
५. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्रमांकः क्र. ईडीडी-२०१३/प्र.क्र.३५०/अ.क्र.१ दि. २४.१.२०१४
६. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्रमांकः क्र. विभशा-२०१४/प्र.क्र.०७/विजाभज-२, दि. १३.५.२०१४
७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः क्र.बीसीएच-२०१३/ प्र.क्र. ३१३/शिक्षण-२, दि. ३१.१०.२०१४
८. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.याचिका -२०१५/प्र.क्र.१५०/ विजाभज-२ , दि.१/४/२०१६
९. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,शासन निर्णय क्र.याचिका -२०१५/प्र.क्र.१५०/विजाभज-२ शुद्धिपत्रक दि.१७/१०/२०१६.

**प्रस्तावना**

राज्यात सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी तसेच ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी स्वयंसेवी संस्थामार्फत अनुदान तत्वावर आश्रमशाळा चालविल्या जात आहेत. त्यानुसार राज्यात सद्यस्थितीत ५२६ प्राथमिक आश्रमशाळा, २९६ माध्यमिक आश्रमशाळा, उसतोड कामगारांच्या मुलांसाठी ४ आश्रमशाळा , १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळा व १ विद्यानिकेतन अशा एकूण ९७५ आश्रमशाळा कार्यरत आहेत. त्याप्रमाणे अनुसूचित जातीच्या मुला-मुलींसाठी १० प्राथमिक व ९ माध्यमिक अशा एकूण १९ आश्रमशाळा कार्यरत आहेत.

२. शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार ज्या स्वंयसेवी संस्था आश्रमशाळा चालवित नाहीत, अशा संस्थांना नैसर्गिक न्यायाच्या तत्वानुसार उचित संधी देवूनही विहित केलेल्या कार्यपध्दती नुसार/शासनाच्या ध्येयधोरणानुसार आश्रमशाळा चालवित नसल्यास, सदर आश्रमशाळेची मान्यता रद्द केली जाते, तर काही कारणास्तव त्या बंद पडतात. अशा बंद पडलेल्या राज्यातील आश्रमशाळा प्रवेशितांचे शैक्षणिक नुकसान होते व त्यांच्या प्रगतीचा उद्देश सफल होत नाही. तसेच या शाळांतील शिक्षक व शिक्षकेत्तर

कर्मचारीही अतिरिक्त ठरतात आणि त्यांच्या समायोजनाचा, वेतनाचा प्रश्न निर्माण होतो. त्यामुळे अशा मान्यता रद्द केलेल्या किंवा बंद पडलेल्या आश्रमशाळा, अन्य संस्थांना हस्तांतरण व स्थलांतरण करण्यासाठी तसेच सध्या कार्यरत असलेल्या आश्रमशाळा अन्य ठिकाणी स्थलांतर व इतर संस्थेकडे हस्तांतरण करण्यासाठी शासनाने वेळोवेळी शासन निर्णय निर्गमित केले आहेत.

**३.** मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी विजाभज आश्रमशाळा संदर्भात रिट याचिका क्र.९४९/२०१२, ८६८६/२०११, १२७४/२०१२, १७२८/२०१२ व १४०४/२०१३ या याचिकांवर निर्णय देताना बंद आश्रमशाळांचे अन्य संस्थांना हस्तांतरण करण्यासंबंधी पारदर्शक असे धोरण निश्चित करण्याबाबत शासनास सूचना दिलेल्या आहेत. त्यामुळे मा. उच्च न्यायालयाच्या सूचना विचारात घेऊन तूर्त मान्यता काढण्यात आलेल्या अथवा रद्द करण्यात आलेल्या किंवा काही कारणास्तव बंद पडलेल्या आश्रमशाळेतील कर्मचाऱ्यांचे अंतिमत: समायोजन व वेतनाबाबत कार्यवाही करण्याकरीता बंद / मान्यता रद्द केलेल्या आश्रमशाळा अन्य संस्थेस हस्तांतर करणेबाबतचे सर्वकष असे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय**

विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी तसेच ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठी सुरु केलेल्या आश्रमशाळा, अनुसूचित जातीच्या मुला-मुलींसाठी सुरू असलेल्या आश्रमशाळा यापैकी शासनाने वेळोवेळी लागू केलेल्या विहित अटी व शर्तीची पूर्तता न केल्यामुळे मान्यता काढून घेतलेल्या अथवा रद्द केलेल्या किंवा काही कारणास्तव बंद पडलेल्या किंवा एखादी स्वयंसेवी संस्था स्वेच्छेने चालवू इच्छित नसल्याने बंद करण्यात आलेली आश्रमशाळा अन्य स्वयंसेवी संस्थांमार्फत सुरु करण्यासाठी किंवा त्यांचे हस्तांतरण व स्थलांतरण करण्यासंबंधीचे शासनाने यापूर्वी निर्गमित केलेले या विषयासंबंधातील सर्व शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे निश्चित केलेल्या कार्यपध्दतीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

**१. बंद / मान्यता रद्द करण्यात आलेल्या आश्रमशाळा अन्य संस्थेस हस्तांतर करण्याची कार्यपद्धती:-**

१) बंद / मान्यता रद्द झालेली आश्रमशाळा बृहत आराखड्यामध्ये समाविष्ट असावी. सदर आश्रमशाळा बृहत आराखड्यामध्ये समाविष्ट नसल्यास तिचा हस्तांतर / स्थलांतरणासाठी विचार केला जाणार नाही तसेच ती कायमस्वरूपी बंद करण्यात यावी.

२) बंद / मान्यता रद्द झालेल्या आश्रमशाळा स्थलांतरीत / हस्तांतरीत करण्याकरीता त्या आश्रमशाळेतील विद्यार्थी संख्या विचारात घेणे आवश्यक नाही.

३) बंद किंवा मान्यता रद्द केलेल्या आश्रमशाळांच्या ठिकाणांसहीत नावांची यादी, त्या भागातील दोन प्रसिद्ध दैनिक वर्तमानपत्रात तसेच विभागाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात यावी आणि इच्छूक संस्था, एन.जी.ओ. यांच्याकडून अर्ज मागविण्यात यावेत. तसेच अशाप्रकारचे खुले प्रस्ताव मागवितांना सदर संस्था त्या जिल्हयातील किंवा लगतच्या जिल्हयातील असणे आवश्यक राहील.बंद / मान्यता रद्द झालेली अनुदानित आश्रमशाळा ज्या महसुली विभागामध्ये सुरु होती त्याच महसुली विभागामध्ये स्थलांतरीत / हस्तांतरीत करण्यासाठी प्रस्ताव मागविण्यात यावेत. तसेच अशा प्रकारच्या स्थलांतर / हस्तांतरणाने बाधित होणाऱ्या पालक, नागरिक आणि शिक्षक व शिक्षकेतर वर्ग यांचेकडून सूचना मागविण्यात याव्यात.

४) इच्छुक संस्थेने जाहिरातीस अनुसरून विहित नमून्यात संबंधीत सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग यांचेकडे अर्ज करावा.

५) इच्छुक स्वयंसेवी संस्थेकडे संस्था नोंदणी अधिनियम १८६०, सार्वजनिक विश्वस्त अधिनियम, १९५० अंतर्गतचे नोंदणी प्रमाणपत्र असावे तसेच धर्मादाय आयुक्तांकडे या संस्थेची नोंदणी केलेली असावी व त्यात स्पष्टपणे शैक्षणिक कार्य किंवा शाळा चालविण्याबाबतचे उद्देश असावेत.

६) संस्थेने नोंदणी प्रमाणपत्र व संस्थेच्या घटनेची प्रत सक्षम प्राधिकाऱ्याकडून साक्षांकित करुन अर्जासोबत जोडावी. संस्था जेथे कार्य करणार आहे, त्या जिल्हयात / ठिकाणामध्ये संस्थेचे कार्यक्षेत्र असावे. आश्रमशाळा

चालविण्यासाठी इच्छूक असलेल्या संस्थेस आश्रमशाळा / शैक्षणिक संस्था चालविण्याचा किमान ४ ते ५ वर्षाचा अनुभव असावा.

७) संस्थेने अर्ज करतांना आयुक्त, समाज कल्याण /संचालक,वि.जा.भ.ज यांच्या नावाने रु.१०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) एवढी रक्कम चलनाव्दारे भरणे आवश्यक आहे. (सदरची रक्कम ना परतावा असेल)

८) अर्ज करतांना संस्थेच्या बँक खात्यात किमान रु.१०.०० लक्ष (रुपये दहा लक्ष फक्त) एवढी रक्कम जमा असणे आवश्यक आहे. यासाठी संबंधित बँकेचे प्रमाणपत्र अर्जासोबत जोडावे. संस्थेकडे १ वर्षासाठी खर्च करता येतील इतकी रक्कम त्यांच्या बँक बचत किंवा चालू खात्यावर शिल्लक असणे अनिवार्य आहे.

९) संस्थेने लगतच्या पाच वर्षातील लेखा परिक्षणाच्या अहवालाची साक्षांकित प्रत अर्जासोबत जोडावी.

१०) संस्थेकडे किमान ३ एकर जागा स्वत:च्या मालकीची अथवा भाडेकरारावर घेतली असल्यास संस्था स्थलांतरणाने / हस्तांतरणाने आश्रमशाळा घेण्यास पात्र राहील.

११) संस्थेस धर्मादाय आयुक्तानी किंवा शासनाने दंड केलेला असल्यास त्याबाबतची माहिती अर्जासोबत जोडावी. संस्थेच्या सुरु असलेल्या शाळातील गैरप्रकाराबाबत इतर विभागांनी संस्थेच्या विरुध्द यापूर्वी केलेली कार्यवाही, याबाबतची माहिती द्यावी. संस्थेने यापूर्वी निधीचा अपहार केल्याच्या तक्रारी प्राप्त असल्यास त्याची माहिती द्यावी.

१२) संस्थेने यापूर्वी शासनाविरुध्द मा.उच्च न्यायालयात रिट याचिका दाखल केली होती किंवा कसे ? असल्यास, ती प्रलंबित आहे का, किंवा निकाल लागला असल्यास त्याची माहिती द्यावी.

१३) ज्या शैक्षणिक वर्षात अनुदानित आश्रमशाळेची मान्यता रद्द करण्यात आलेली आहे, किंवा बंद करण्यात आलेली आहे त्या शैक्षणिक वर्षाच्या अखेरपर्यंत सदर आश्रमशाळा प्रशासकामार्फत चालू ठेवण्यात यावी. नवीन शैक्षणिक वर्ष सुरू होण्यापूर्वीच तेथील विद्यार्थ्यांचे नजीकच्या आश्रमशाळेत समायोजन करून आश्रमशाळा सक्षम स्वयंसेवी संस्थेस विहित कार्यपद्धतीनुसार हस्तांतर करण्याची प्रक्रिया सुरू करावी.

**२. आश्रमशाळा मान्यता रद्द करण्याची सर्वसाधारण कारणे:-**

१) शाळेचा शैक्षणिक दर्जा न राखणे,पुरेसे प्रवेशित विद्यार्थी नसणे.

२) निवासी विद्यार्थ्यांना मानकानुसार भोजन, तसेच शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन न देणे.

३) संस्थेची आर्थिक स्थिती सुस्थितीत नसणे.

४) विद्यार्थ्यांच्या निवासाकरीता स्वंतत्र, पुरेशी इमारत उपलब्ध करुन न देणे, तसेच पाणी, वीज, स्वच्छतागृहे, स्नानगृहे इ.मुलभूत सुविधा शासन निर्णय दि.१६.१०.२००३ परिशिष्ट ४ नुसार उपलब्ध करुन न देणे.

५) शाळेचे कामकाज शासनाच्या ध्येयधोरणाला बाधा येईल, असे चालविणे अथवा शासनाच्या नियमांचे किंवा आदेशांचे पालन न करणे.

६) शाळेच्या कामकाजावर व्यवस्थापनाच्या निष्काळजीपणामुळे उद्भवणाऱ्या गंभीर घटना, उदा. विद्यार्थ्यांचा मृत्यू, आत्महत्या, बलात्कार, लैंगिक अत्याचार,संर्पदंश, अपघात व या सारख्या अन्य घटना.

७) शाळातील कर्मचाऱ्यांच्या आरक्षण बिंदू नामावलीचे अनुपालन न करता केलेल्या नियमबाहय नियुक्त्या, वेतनातील अनियमितता.

८) शाळांतील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचारी वर्ग व व्यवस्थापन यांचेमधील वाद विवाद.

९) राज्य शासनाचे / वरिष्ठ कार्यालयाचे आदेश न पाळणे, अंमलबजावणी अधिकारी/क्षेत्रीय अधिकारी यांना तपासणी दरम्यान आश्रमशाळेचे अभिलेखे न दाखवणे किंवा खोटे/फसवे अभिलेखे तयार करुन शासनाचे अनुदान लाटण्याचा प्रयत्न करणे, शाळा सोडल्याचा दाखला न देणे, विद्यार्थ्यांची गैरसोय करणे, चुकीची विद्यार्थी संख्या दाखवून जास्तीचे परिपोषण अनुदान घेणे किंवा नियमबाह्य अतिरिक्त तुकडी मंजूर करुन अतिरिक्त कर्मचाऱ्यांची नियुक्ती करणे.

१०) कोणत्याही शाळेचे हस्तांतरण अन्य नविन संस्थेकडे करण्यात आल्यानंतर सदर शाळेतील सर्व शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे समायोजन सदर शाळेत करण्यात येईल.

**३. आश्रमशाळांचे स्थलांतर करणे :-**

१) शाळा ज्या ठिकाणी कार्यान्वित आहे अशा ठिकाणी सिंचन प्रकल्प अथवा इतर सार्वजनिक उपक्रम सुरु होणार असतील व त्यासाठी सदरच्या जागेचे अधिग्रहण करणे आवश्यक असेल किंवा पूर, भूकंप इत्यादी सारख्या नैसर्गिक आपत्तीचा धोका असेल .

२) सध्या आश्रम शाळा ज्या ठिकाणी आहे त्या सभोवतालची अनेक गावे दुसरीकडे वसाहतीसाठी गेल्यामुळे किंवा इतर कारणांमुळे आश्रमशाळेच्या परिसरातील असलेली लोकसंख्या कमी झाल्यामुळे आश्रमशाळेतील प्रवेशित विद्यार्थ्यांची मान्य संख्या ५० टक्के पेक्षा कमी असल्यास.

३) ज्या ठिकाणी आश्रमशाळा असेल त्या ठिकाणी मुलभूत सोयी सुविधा इत्यादीबाबत गंभीर समस्या असल्यास किंवा जातीय तणाव, गटबाजीचा संघर्ष मोठया प्रमाणात वाढणे इत्यादी सारख्या सार्वजनिक अशांततेच्या घटना वारंवार घडल्यामुळे आश्रमशाळेची विद्यमान जागा असुरक्षित असल्यास सध्या चालू असलेली आश्रमशाळेच्या ठिकाणापासून त्या जिल्हयामध्येच १० कि.मी.परिसरात किंवा सदर प्रकल्प बाधीत गाव ज्या ठिकाणी पुनर्वसित होत आहे किंवा झाले आहे.

४) संस्थेस आश्रमशाळा चालू असलेल्या ठिकाणी वीज, पाणी, इमारत, मैदान किंवा अन्य स्थानिक अपुऱ्या सोयीमुळे किंवा स्थानिक प्रासंगिक कारणामुळे एखादया शाळेचे स्थलांतर त्याच शाळेच्या परिसरात १० कि.मी.चे अंतरावर करणे आवश्यक असल्यास वस्तुस्थितीचा अहवाल प्राप्त करुन घेऊन आयुक्त, समाज कल्याण, संचालक, वि.जा.भ.ज, इ.मा.व. व वि.मा.प्र, कल्याण संचालनालय, पुणे यांच्या परवानगीने नवीन ठिकाणी संस्थेने केलेल्या मुलभूत सोयी-सुविधा विचारात घेऊन स्थलांतरास परवानगी देण्याबाबत विचार केला जाईल.

५) शासनाच्या मान्यतेशिवाय आश्रमशाळा स्थलांतरण केल्यास ते अवैध ठरविण्यात येईल व त्यामुळे उद्भवणारे विविध प्रश्न उदा. कर्मचारी, स्थावर जंगम मालमत्ता व विद्यार्थी संख्या याबाबत राज्य शासनाची कोणतीही जबाबदारी राहणार नाही. त्यामुळे अशी परस्पर स्थलांतरित केलेल्या आश्रमशाळेची मान्यता आपोआप रद्द समजण्यात येईल. अशा रद्द झालेल्या शाळा अन्य संस्थेकडे हस्तांतरण करण्याचे अधिकार शासनास राहतील. तथापि, सध्या कार्यरत असलेल्या आश्रमशाळा सध्याच्या संस्थेकडून अन्य संस्थेकडे त्यांच्या परस्पर संमतीने हस्तांतरण करता येणार नाही. एखाद्या संस्थेस त्यांच्याकडील शाळा चालविणे शक्य होत नसेल तर सदर संस्था त्यांचेकडील उपक्रम शासनास हस्तांतरण करतील, त्यानंतर शासन या शासन निर्णयातील तरतूदीनुसार त्यावर कार्यवाही करेल. कोणत्याही परिस्थितीत संस्थेने त्यांच्याकडील आश्रमशाळा अन्य संस्थेस हस्तांतरण केल्यास त्यास शासन मान्यता देण्यात येणार नाही.

**४. स्थलांतरण / हस्तांतरणाचा निर्णय घेण्यासाठी समितीची स्थापना**

**प्रादेशिक समिती**

| | | |
|---|---|---|
| १ | संबंधीत प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण | **अध्यक्ष** |
| २ | संबंधित सहाय्यक आयुक्त समाज कल्याण, जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (त्यांचे अधिनस्त संस्थांशी संबंधित नसलेला.) | **सदस्य (संख्या एक)** |
| ३ | संबंधीत सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद. (त्यांचे अधिनस्त योजनेशी संबंधित.) | **सदस्य सचिव** |

वरील समितीने प्राप्त प्रस्तावाची प्रचलीत नियमांच्या आधारे छाननी करून पात्र प्रस्ताव आपल्या शिफारशींसह संबंधित आयुक्त, समाज कल्याण / संचालक, वि.जा.भ.ज, इ.मा.व. व वि.मा.प्र, कल्याण संचालनालय, पुणे यांना सादर करावेत.

**राज्यस्तरीय समिती**

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेशी संबधित आयुक्त, समाज कल्याण/ संचालक, वि.जा.भ.ज, इ.मा.व. व वि.मा.प्र, कल्याण संचालनालय, पुणे | **अध्यक्ष** |
| २ | योजनेशी संबधित सहआयुक्त, समाज कल्याण व सहसंचालक, वि.जा.भ.ज, इ.मा.व. व वि.मा.प्र, कल्याण संचालनालय, पुणे | **सदस्य** |
| ३ | संबधित उपायुक्त, समाज कल्याण / उपायुक्त व उप-संचालक, वि.जा.भ.ज, इ.मा.व. व वि.मा.प्र, कल्याण संचालनालय, पुणे | **सदस्य** |
| ४ | संबधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण / सहाय्यक आयुक्त व सहाय्यक संचालक, वि.जा.भ.ज, इ.मा.व. व वि.मा.प्र, कल्याण संचालनालय, पुणे | **सदस्य सचिव** |

वरीलप्रमाणे गठीत केलेल्या राज्यस्तरीय समितीने प्रादेशिक समितीकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची तपासणी करुन प्रादेशिक समितीने केलेल्या शिफारशी विचारात घेऊन दोन आठवडयात आपल्या स्वयंस्पष्ट शिफारशीसह अथवा अभिप्रायासह प्रस्ताव शासनाकडे सादर करावा.

**५. सर्वसाधारण निर्देश :-**

१. प्रादेशिक स्तरावरील समिती तसेच राज्यस्तरीय समिती शासनास प्रस्तावांची शिफारस करेल. तद्नंतर शासन सक्षम व पात्र असणाऱ्या संस्थेस बंद पडलेल्या अथवा मान्यता रद्द केलेल्या किंवा काढून घेतलेल्या आश्रम शाळा हस्तांतरण करण्याबाबत यथायोग्य निर्णय शासनस्तरावरून गठित समिती द्वारे घेतला जाईल व शासनाचा तो निर्णय अंतिम राहील. शासनाने मान्यता रद्द केलेल्या अथवा काढून घेतलेल्या किंवा काही कारणास्तव बंद झालेल्या आश्रमशाळा विचारात घेवून दरवर्षी नविन शैक्षणिक वर्ष सुरु होण्यापूर्वी आश्रम शाळा हस्तांतरण आदेश शासनस्तरावरुन पारित केले जातील.

२. विद्यार्थी संख्येअभावी बंद पडलेली शाळा पुन्हा त्याच ठिकाणी सुरु करण्यास परवानगी दिली जाणार नाही. तेथील प्रवेशित विद्यार्थ्यांना प्रकरणपरत्वे लगतच्या शाळेत समायोजन करण्याची व्यवस्था केली जाईल.तसेच सदरहू आश्रमशाळा हस्तांतरण / स्थलांतरण करण्याची आवश्यकता नाही. सदरहू आश्रमशाळेतील कर्मचारी वर्गास समायोजनाच्या यादीवर ठेवण्यात येईल.

३. बंद पडलेल्या अथवा मान्यता रद्द केलेल्या आश्रमशाळेत जेवढे शैक्षणिक वर्ग सुरु करण्यात आले होते, ते सर्व वर्ग आश्रमशाळा हस्तांतरीत / स्थलांतरीत झालेल्या ठिकाणी एकाच वेळी सुरु करणे आवश्यक राहील. तसेच या बंद पडलेल्या अथवा मान्यता रद्द केलेल्या आश्रमशाळांमधील मान्यता प्राप्त सर्व शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना सामावून घेण्याची जबाबदारी नविन संस्थेची राहील. शाळा हस्तांतरणाच्या / स्थलांतरणाच्या अनुषंगाने कोणत्याही नविन पदास मान्यता दिली जाणार नाही. शाळातील पटसंख्या कमी झाल्याने मान्यता रद्द केल्यास अशा शाळातील कर्मचाऱ्यांना जेष्ठतेनुसार अतिरिक्त कर्मचाऱ्यांच्या यादीत समाविष्ट केले जाईल व जेष्ठतेनुसार त्यांचे अन्य आश्रमशाळेत समायोजन केले जाईल.

४. हस्तांतरीत / स्थलांतरीत झालेल्या ठिकाणी आश्रम शाळा शैक्षणिक वर्ष सुरु झाल्यापासून ३० दिवसात सुरु करणे बंधनकारक राहील. विहित मुदतीत आश्रमशाळा सुरु न केल्यास सदर आश्रम शाळेचे हस्तांतरण / स्थलांतरण आपोआप रद्द झाल्याचे समजण्यात येईल.

५. बंद पडलेल्या / मान्यता रद्द करण्यात आलेल्या किंवा विद्यार्थी पटसंख्या कमी झाल्याने अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या आश्रम शाळेतील सर्व मान्यताप्राप्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची नियुक्ती हस्तांतरीत झालेल्या शाळेमध्ये करण्यात येईल व अशा कर्मचाऱ्यांना ३० दिवसात तेथे रुजू होणे बंधनकारक राहील. अशा अतिरीक्त ठरविण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतनाबाबत या विभागाच्या संदर्भ क्र.८ व ९ मध्ये नमुद शासन निर्णयाच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

६. जे शिक्षक किंवा शिक्षकेतर कर्मचारी हस्तांतरीत झालेल्या आश्रम शाळेच्या ठिकाणी उचित कारणाशिवाय ३० दिवसाच्या आत रुजू होणार नाहीत, अशा कर्मचाऱ्यांना तीन संधी दिल्या जातील. त्यानंतरही ते नियुक्तीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास त्यांना सेवेची आवश्यकता नाही, असे समजून त्यांची सेवा समाप्त करण्यात येईल व अशा कर्मचाऱ्यांच्या रिक्त जागेवर जिल्हयातील, विभागातील किंवा राज्यातील अतिरिक्त कर्मचाऱ्यांच्या यादीमधून सेवाजेष्ठ कर्मचाऱ्याची समायोजनाने नियुक्ती करण्यात येईल.

७. हस्तांतरीत / स्थलांतरीत झालेल्या शाळा उत्तमरित्या संस्थेच्या स्वनिधीतून चालविणे ही जबाबदारी प्रामुख्याने संबंधित स्वयंसेवी संस्थेची राहील. देय बाबींवरील अनुज्ञेय खर्चाची प्रतिपूर्ती वेळोवेळी शासनाचे ध्येयधोरण व अनुदानाचे उपलब्धतेनुसार केली जाईल, अशा संमत्तीचे हमीपत्र संस्थेने सोबत जोडणे बंधनकारक राहील.

८. शासनाच्या आदिवासी विकास विभाग किंवा सामाजिक न्याय विभागाने यापूर्वी अर्जदार संस्थेची एखादी शाळाची मान्यता रद्द केली असल्यास अथवा मान्यता काढून घेतली असल्यास किंवा काही कारणास्तव बंद पडली असल्यास पुन्हा अन्य संस्थेची शाळा अशा अर्जदार संस्थेकडे हस्तांतर / स्थलांतरण करण्याबाबतचा निर्णय घेण्याचे अधिकार शासनास राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१९१६४००७२८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jalandhar Madhav Gosavi

Digitally signed by Jalandhar Madhav Gosavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=010ebf10ad01f09c23969e1d80b48a44066a9122f464e555f80af35b24d57d93, cn=Jalandhar Madhav Gosavi
Date: 2016.12.19 16:43:54 +05'30'

**(जा.मा.गोसावी)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव.
५. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.
६. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे
९. विभागातील सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग (सर्व)
१२. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण (सर्व)
१३. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१४. निवड नस्ती (विजाभज-२).